सन २०१५-१६ करीता मनोधैर्य योजनेअंतर्गत पिडीत महिला व बालकांना तातडीने अर्थसहाय्य देण्याकरीता पुरवणी मागणीव्दारे प्राप्त झालेला निधी वितरीत करणेबाबत... योजनांतर्गत (Plan).

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक : पुरवणी-२०१५/प्र.क्र.१४९/का-२
नवीन प्रशासकीय इमारत, ३रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २७ ऑक्टोंबर, २०१५.

<u>वाचा</u> : १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.पूरक-२०१५/प्र.क्र.१४०/अर्थ-३, दि.१ ऑगस्ट, २०१५ व समक्रमांकाची दि. ११/९/२०१५ व दिनांक ६/१०/२०१५ ची परिपत्रके.

३) आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे क्रमांक- मबाविआ/म.वि/ पु.मा.निधी/ वितरण/२०१५-१६/४९४०, दिनांक ७.९.२०१५ चे पत्र.

**<u>प्रस्तावना</u> :-**

बलात्कार / लैगिक अत्याचार आणि ॲसिड हल्ल्यातील पिडीत महिला व बालकांना तात्काळ अर्थसहाय्य देण्यासाठी व त्यांचे पुनर्वसन करण्यासाठी राज्यात दि. २.१०.२०१३ पासून कार्यान्वीत असलेल्या "मनोधैर्य" योजनेतील लाभार्थ्यांना तातडीने अर्थसहाय्य देण्यासाठी वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १ ऑगस्ट, २०१५ च्या परिपत्रकान्वये सन २०१५-१६ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत निधीव्यतिरीक्त पुरवणी मागणीन्वये रू.१२,८८,९६,०००/- इतका निधीस वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१/५/२०१५ च्या आदेशान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे.

याअनुषंगाने आयुक्त, महिला व बाल विकास विभाग, पुणे यांनी त्यांच्या संदर्भाधिन क्रमांक-३ च्या पत्रान्वये त्यांच्यामार्फत या प्रयोजनासाठी झालेल्या खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे संबधित जिल्हा कार्यालयांकडून संकलीत करून महालेखापाल कार्यालयास पाठविण्यात येत असल्याचे कळविले असून, सद्य:स्थितीत प्रलंबित प्रकरणांत लाभार्थ्यांना तातडीने अर्थसहाय्य अदा करण्यासाठी पुरवणी मागणीव्दारे प्राप्त झालेला निधी BDS वर

वितरीत करण्याची विनंती केली आहे. यासंदर्भात आता वित्त विभागाने त्यांच्या संदर्भाधिन दिनांक ६.१०.२०१५ च्या परिपत्रकान्वये **पुरवणी विनियोजन अधिनियमानुसार ज्या पुरक मागण्या वित्त / नियोजन विभागाने काही अटी व शर्तीवर मंजूर केल्या असतील त्या वगळून इतर पुरक मागण्यांचे ७० %/ निधीचे वितरण संबधित प्रशासकीय विभागांनी त्यांच्या स्तरावर करावे असे कळविले आहे. मात्र सदर निधी वितरीत करण्यापुर्वी प्रशासकीय विभागांनी नियोजन व वित्त विभागाने यापुर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१७.४.२०१५ च्या परिपत्रकातील सूचनांचे तंतोतंत पालन करणे आवश्यक असल्याचे वित्त विभागाने कळविले आहे.**

**शासन निर्णय:-**

वरील पार्श्वभूमीवर वित्त विभागाच्या सदर्भाधिन दिनांक ६.१०.२०१५ च्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारांस अनुसरून सन २०१५-१६ मध्ये पिडित महिला व बालकांना तातडीने अर्थसहाय्य व त्यांचे पुनर्वसन करण्यासाठी मनोधैर्य योजनेच्या **"२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (२४) पिडीत महिला व बालक मनोधैर्य योजना, (२४)(०१) पिडीत महिला व बालक मनोधैर्य योजना (२२३५-बी-१८३)ए ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (योजनांतर्गत योजना)"** या लेखाशिर्षाअंतर्गत पुरवणी मागणीव्दारे मंजूर झालेल्या रू.१२,८८,९६,०००/- इतक्या निधीपैकी ७० % या प्रमाणात असलेली रक्कम रू.९,०२,२७,२००/- (रूपये नऊ कोटी दोन लाख सत्तावीस हजार दोनशे फक्त) या आदेशान्वये BDS वर वितरीत करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. यासंदर्भात वित्त विभागाच्या संदर्भाधीन दिनांक १७ एप्रिल, २०१५ च्या शासन निर्णयात नमूद केलेल्या तपासणी सूचीतील सर्व बाबींची तसेच त्या आदेशातील परिच्छेद-७ ते परिच्छेद-१८ मधील लागू होणाऱ्या अटींची पुर्तता होत असल्याचे संबधित नियंत्रक अधिकारी / आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी प्रमाणित केले असून उपरोक्त लेखाशिर्षाखाली यापूर्वीच्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधीतांकडून त्वरीत प्राप्त करुन महालेखापाल कार्यालयास पाठविण्याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी घ्यावी.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक पूरक-२०१५/प्र.क्र.१४०/अर्थ-३, दि. ६ ऑक्टोबर,२०१५, अन्वये विभागाला प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१५१०२७१२००३९९९३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

DALVI VINOD VASANT

Digitally signed by DALVI VINOD VASANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 917996, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DALVI VINOD VASANT
Date: 2015.10.27 15:34:54 +05'30'

(वि.व.दळवी)
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर
४) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
७) वित्त विभाग (व्यय-६)(अर्थसंकल्प-७), मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
८) अवर सचिव (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई.
९) सर्व अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती, का-२.